**चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर संकुल मध्ये खेळाचे मैदान बांधकाम अंतर्गत इनडोअर गेम हॉल व लॉन टेनिस मैदान कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०२२/प्र.क्र.२१०/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २४ एप्रिल, २०२३

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९
२. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.वनबां-२०२२/प्र.क्र.२१०/फ-९, दि.०४.०१.२०२३
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२४/लेखा/प्र.क्र. (२०२२-२३)/१२२१/२२-२३, दिनांक १७.०३.२०२३

**प्रस्तावना:-**

चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर संकुल मध्ये खेळाचे मैदान बांधकाम अंतर्गत इनडोअर गेम हॉल व लॉन टेनिस मैदान कामाचे रु.४७४.६० लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये सादर करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णय दिनांक २०.०९.२०१९ मधील भाग एक उपविभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे संदर्भ क्र.२ दिनांक २५.०९.२०१९ च्या परिपत्रकान्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु.१५ कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधीत उपभोक्ता विभागास देण्यात आलेले आहेत.

चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर येथे खेळाचे मैदान बांधकाम अंतर्गत इनडोअर गेम हॉल व लॉन टेनिस मैदान कामाचे रु. ४७४.६० लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी तांत्रीक सहमती (Technical Approval) प्रदान केलेली आहे. त्यानुसार सदर कामाकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचा संदर्भ क्र.१ चा शासन निर्णय व सार्वजनिक बांधकाम विभागाचे संदर्भ क्र.२ चे परिपत्रक विचारात घेता, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर संकुल मध्ये खेळाचे मैदान बांधकाम अंतर्गत इनडोअर गेम हॉल व लॉन टेनिस मैदान कामाच्या रु.४७४.६० लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास सोबतच्या RECAPITULATION SHEET (प्रपत्र-अ) प्रमाणे खालील अटी व शर्तीस अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

१. अंदाजपत्रक व नकाशे उपभोक्ता विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून साक्षांकित करुन घेण्यात यावे.

२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. सदरची कामे प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या रक्कमेतच पूर्ण होतील याची दक्षता घेण्यात यावी.
४. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक:बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
६. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
७. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
८. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.
९. वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ परिपत्रकातील अटी व वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.
१०. शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भातील शासन निर्णयातील भाग एक उपविभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९ अन्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु.१५ कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे उपभोक्ता विभागास प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२४१८०७४२७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: CN = PINGALE BHANUDAS NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2023.04.24 18:13:26 +05'30'

**( भा. ना. पिंगळे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर
५. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी चंद्रपूर
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

“प्रपत्र-अ”

शासन निर्णय क्रमांक :-वनबां-२०२२/प्र.क्र.२१०/फ-९, दिनांक: २४ एप्रिल, २०२३ चे सोबतचे प्रपत्र-अ

**Name of work : Construction of Indoor Hall & Lawn Tennis Ground for Chandrapur Forest Administration Development & Management Academy, Chandrapur Dist. Chandrapur**

## RECAPITULATION SHEET

| **S.N.** | **PARTICULARS** | **Amount in Rs.** |
|---|---|---|
| (A) ESSENTIAL ITEMS | | |
| | Building Proper (Built Up Area-Sqm) | |
| | Indoor Game Hall | 28848392.00 |
| | Sub Total A. | 28848392.00 |
| (B) (a) ESSENCIAL OTHER CIVIL ITEMS – Nil | | 0.00 |
| | **Sub Total (B) (a)** | **0.00** |
| (b) | ESSENCIAL SPORT FACILITY | |
| i) | Lawn Tennis Ground | 4429704.00 |
| | **Sub Total (B) (b)** | 4429704.00 |
| (C) CIVIL OPTIONAL ITEMS - Nil | | |
| | **Sub Total= (C)** | **0.00** |
| D)EXTERNAL WATER SUPPLY AND SANITORY WORKS | | 865452.00 |
| | **Sub Total= (D)** | 865452.00 |
| **(E) TOTAL CIVIL WORK COST (A+B+C+D)** | | **34143548.00** |
| (F) ESSENTIAL ELECTRICAL ITEMS | | |
| | **Sub Total= (F)** | **0.00** |
| (G) ELECTRICAL SUPPLY ITEMS | | |
| | **Sub Total= (G)** | **0.00** |
| (H) OPTIONAL ELECTRICAL ITEMS- Nil | | |
| | **Sub Total= (H)** | **0.00** |
| (I) TOTAL ELECTRICAL WORK COST | | |
| | **Total Electrical Work Cost (F+G+H)** | **0.00** |
| (J) SOLAR ENERGY AND EQUIPMENTS-Nil | | |
| | **Total Solar Work Cost (J)** | **0.00** |
| (K) TOTAL SOLAR WORK COST | | |
| | **Total Solar Work Cost (K)** | **0.00** |
| (L) OTHER MISLANIOUS WORKS | | 0 |
| | **Total Other Misc Works Cost (L)** | **0** |
| (M) TOTAL OTHER MISLANIOUS WORKS COST | | 0 |

| | | |
|---|---|---|
| **(N) TOTAL WORK COST : Project Cost (P) =A+B+C+D+ E+(E)+F+G+H+I+J+K+L+M** | | **34143548.00** |
| (O) PERCENTAGES OVER WORK COST | | |
| i | Contingencies (4%) | 1365742.00 |
| ii | Green Building Concept (5%) | 1707177.00 |
| iii | GST (18%) | 6145839.00 |
| iv | Price Escalation (3%) | 1024306.00 |
| v | Architecture Services(3 To 5% Pts. (3.5%) (3%) | 1024306.00 |
| vi | Centage 5% for Charges (if any for other Dept. work)(5%) | 1707177.00 |
| vii | Insurance (1.0%) | 341435.00 |
| | **Total Cost of the Project = (TPC):** | **47459530.00** |
| | **Say Rs.** | **474.60 Lakh** |

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: CN = PINGALE BHANUDAS NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2023.04.24 18:13:45 +05'30'

**( भा. ना. पिंगळे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**